**सहायक अभियंता श्रेणी-१ (स्थापत्य) या संवर्गातून कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील पदोन्नती उपरांतच्या पदस्थापनेत बदल.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-११२३/प्र.क्र.१०५/सेवा-१(१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ९ जून, २०२३

**संदर्भ** : १) सा. बां. विभाग शासन आदेश क्र.: पीओजी-११२२/प्र.क्र. ४०/सेवा-१, दिनांक २७.०४.२०२२.
२) सा. बां. विभाग शासन आदेश क्र.: टीएफएस-११२३/प्र.क्र.१०५(४)/सेवा-१, दिनांक २५.५.२०२३.

**शासन आदेश :-**

संदर्भ क्र. १ येथील शासन आदेशातील अ. क्र. ५६ येथील श्री. अविनाश रा. मोरे, सहायक अभियंता श्रेणी-१ यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आलेली आहे. पदोन्नतीउपरांत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) म्हणून श्री. मोरे यांना दिलेल्या पदस्थापनेत संदर्भ क्र. २ अन्वये बदल करुन खालील तक्त्यातील स्तंभ ४ मध्ये नमूद केल्यानुसार त्यांना पदस्थापना देण्यात आलेली होती. या आदेशान्वये सदरच्या पदस्थापनेमध्ये सुधारणा करण्यात येत असून, त्यांची सुधारित पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | वाटप झालेला विभाग | यापुर्वी दिलेली पदस्थापना | सुधारित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. अविनाश रा. मोरे | नागपूर | नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर | सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. १, गडचिरोली. |

२. श्री. मोरे यांना संदर्भाधीन पदोन्नती आदेशातील अटी-शर्ती लागू राहतील.

३. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. मोरे यांना पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्यास सांगावे. तसेच, ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्री. मोरे हे पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे त्यांचे लक्ष वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०९१३१६०९९७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR MAHAJAN GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.06.09 13:18:12 +05'30'

**(गंगाधर म. गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / कोकण / पुणे / नाशिक / औरंगाबाद / नांदेड/ अमरावती/ नागपूर / राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे,
५. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
८. संबंधिकत अधिकारी यांना मुख्य अभियंता यांच्या मार्फत,
९. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
१०. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल २, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली/नागपूर,
१३. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन आस्था-१/३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.